एकलव्य निवासी शाळा, एकलव्य मॉडेल डे-बोर्डींग स्कुल व क्रीडा प्राविण्य /उत्कृष्ठता केंद्र यांचे संनियंत्रण करण्यासाठी जिल्हास्तरीय समितीची स्थापना करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : केंजजाका-२०१८/प्र.क्र.५१९/का.१३-अ,**
मादाम कामा रोड, हुतात्मका राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २४ जुलै, २०२०

वाचा :- १) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. शाआशा-१०००/प्र.क्र.४८/का.१३, दिनांक ११ सप्टेंबर, २०००.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. शाआशा-२०१३/प्र.क्र.६८२/का.१३, दिनांक मे, २०१५.
३) भारत सरकार, जनजाती कार्यमंत्रालय,नवी दिल्ली यांचें क्र.१८०१५/१५/२०१८/Grants, दिनांक २१ फेब्रुवारी, २०१९.
४) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. केंजजाका-२०१८/प्र.क्र.५१९/का.१३, दिनांक २८ मे, २०१९.
५) भारत सरकार, जनजाती कार्यमंत्रालय, नवी दिल्ली यांचें क्र. १८०१५/०६/२०२०/EMRS, दिनांक २१ फेब्रुवारी, २०२०.
६) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. केंजजाका-२०१८/प्र.क्र.५१९/का.१३अ, दिनांक १५ जून, २०२०.

**प्रस्तावना :-**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना दर्जेदार शिक्षण मिळावे या हेतुने केंद्र शासनाने नवव्या पंचावार्षिक योजनेत भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये वितरीत होणाऱ्या निधीतून आदिवासी विद्यार्थ्यांसाठी नवोदय विद्यालयाच्या धर्तीवर राज्य स्तरावर एकलव्य निवासी शाळा स्थापन करण्याचा निर्णय घेतला. सदर निर्णयानुसार राज्यातील आदिवासी उपयोजना क्षेत्रात या योजनेअंतर्गत आदिवासी विद्यार्थ्यांसाठी सन २०००-२००१ पासून ते सन २०१९-२० पर्यंत २५ एकलव्य निवासी शाळा मंजूर आहेत. केंद्र शासनाकडून वेळोवेळी नविन शाळा मंजूर करण्यात येत आहेत. या शाळांमध्ये केंद्रीय माध्यमिक शिक्षा बोर्ड, नवी दिल्ली (CBSE) या अभ्यासक्रमाचे इंग्रजी माध्यमातून शिक्षण देण्यात येत आहे.

सदर शाळांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थी /विद्यार्थीनींना भोजन, निवास व्यवस्था, अंथरुण-पांघरुण, वहया-पुस्तके, गणवेश, लेखन साहित्य इत्यादी बाबी मोफत पुरविण्यात येतात. पालकांचा इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये मुलांना पाठविण्याचा वाढता कल लक्षात घेता एकलव्य निवासी शाळांमध्ये इयत्ता १ ली ते ५ वी वर्ग राज्य शासनाच्या निधीतून सुरु करण्यात आले आहेत. सदर शाळा आदिवासी विद्यार्थ्यांच्या सर्वांगिण शैक्षणिक विकासासाठी अत्यंत महत्वाच्या आहेत. सदर शाळांचे संनियंत्रण

करण्यासाठी जिल्हास्तरावर समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीत होती. त्यास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१) एकलव्य निवासी शाळा, एकलव्य मॉडेल डे-बोर्डींग स्कुल व क्रीडा प्राविण्य /उत्कृष्ठता केंद्र यांचे संनियंत्रण करण्यासाठी खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय संनियंत्रण समितीची स्थापना करण्यात येत आहे.

**जिल्हा स्तरीय संनियंत्रण समितीची रचना :-**

| अ.क्र. | समिती पदाधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | सबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी. | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित जिल्हा ) | सदस्य |
| ३ | संबंधित एकलव्य निवासी शाळा क्षेत्राचे प्रकल्प अधिकारी. | सदस्य |
| ४ | जिल्हा शिक्षणाधिकारी (माध्यमिक ). | सदस्य |
| ५ | जिल्हा समाजकल्याण अधिकारी. | सदस्य |
| ६ | पालकमंत्री यांनी नामनिर्देशित केलेले जिल्हयातील शिक्षण क्षेत्राशी सबंधित चार तज्ञ (यापैकी दोन अनुसूचित जमातीचे असावेत). | सदस्य |
| ७ | जिल्हा क्रिडा अधिकारी. | सदस्य |
| ८ | जिल्हा NCC समन्वयक अधिकारी. | |
| ९ | जिल्हा वैद्यकीय अधिकारी. | सदस्य |
| १० | सबंधित जिल्हयातील सर्व एकलव्य निवासी शाळांचे प्राचार्य / मुख्याध्यापक ( जिल्हयात एकापेक्षा अधिक एकलव्य निवासी शाळा असल्यास एका मुख्याध्यापकाची दरवर्षी रोटेशन पध्दतीने सदस्य सचिव म्हणून निवड करण्यात येईल. ) | सदस्य सचिव |

**२) जिल्हा स्तरीय संनियंत्रण समितीचे अधिकार व कर्तव्ये :-**

१) सदर समितीने शाळांची शैक्षणिक प्रगती, पायाभूत सोयी-सुविधांचा विकास, अभ्यासक्रमासाठी पूरक उपक्रम व विद्यार्थ्यांच्या जेवणाची व्यवस्था या सर्व बाबींवर संनियंत्रण करावे.

२) सदर समितीने स्थानिकांचा सहभाग घेऊन शाळेचा कार्यात्मक आणि गुणात्मक विकास करण्यासाठी शाळांना सहकार्य करावे.

३) आदिवासी मुलांना त्यांच्या संस्कृतीची ओळख व्हावी व त्यांचा व्यक्तिगत विकास, स्पर्धापरिक्षा व व्यावसायिक प्रशिक्षण इत्यादींकरिता उपक्रम राबविण्यात यावेत.

४) उक्त शाळेतील विद्यार्थ्यांच्या क्रियाशिलतेला बळकटी देण्यासाठी अतिरिक्त आर्थिक सहाय्य मिळविणे व सार्वजनिक उपक्रमाच्या माध्यतामून विविध उपक्रम राबविण्याचे कार्य करावे.

५) सदर समितीने अनुभवांच्या व सुविधांच्या एकत्रिकरणातून सदर शाळा शैक्षणिक गुणवत्तेच्या अनुषंगाने केंद्रबिंदू ठरण्यासाठी उपक्रम आयोजित करावेत.
६) सदर समितीने शाळेतील पायाभूत सुविधांच्या विकासाचे संनियंत्रण करावे.
७) सदर समितीने शैक्षणिक किंवा इतर कामकाजाच्या बाबींमध्ये आवश्यक असलेल्या कोणत्याही सुधारणा कराव्यात यासाठी महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटीला सूचना द्याव्यात.
८) महाराष्ट्र ट्रायबल पब्लिक स्कूल सोसायटीने सोपविलेली अन्य जबाबदारी समितीने पार पाडावी.

**३) बैठकीची वारंवारता :-**

सदर समितीची प्रत्येक ३ महिन्याला बैठक आयोजित करावी. संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी स्वत: वैयक्तिक लक्ष घालून सदर बैठकीबद्दल आगाऊ नियोजन करुन जिल्हाधिकारी कार्यालयाशी समन्वय साधून वेळ घ्यावी.

**४)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६१६११४९२१६९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, serialNumber=e5bb5862d0e131a274d92f7a1acef953e01301c1b0fb615dc6cce4812bded257, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2020.07.27 16:33:47 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्यसचिव,मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री (आ.वि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (आ.वि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन मुंबई.
८) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) सर्व मा.विधान सभा सदस्य/विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई यांचे मार्फत.
१०) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक
११) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
१२) सर्व विभागीय आयुक्त
१३) सर्व जिल्हाधिकारी
१४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१५) जिल्हा शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद (सर्व)
१६) जिल्हा समाजकल्याण अधिकारी (सर्व),
१७) जिल्हा क्रीडा अधिकारी (सर्व),
१८) जिल्हा NCC समन्वय अधिकारी (सर्व),
१९) जिल्हा वैद्यकीय अधिकारी
२०) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
२१) संचालक, प्राथमिक शिक्षण संचलनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२२) संचालक, माध्यमिक शिक्षण संचलनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२३) संचालक, उच्च शिक्षण संचलनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२४) सदस्य सचिव तथा राज्य प्रकल्प संचालक,महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद,जवाहर बाल भवन ,नेताजी सुभाषचंद्र मार्ग,चर्नी रोड , मुंबई-४००००४
२५) विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक/पुणे/औरंगाबाद/नागपूर/मुंबई.
२६) संचालक, सर्व शिक्षा अभियान संचलनालय, महाराष्ट्र राज्य, चर्नीरोड, मुंबई
२७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २ मुंबई/ नागपूर
२८) महालेखापाल (लेखा परीक्षा ), महाराष्ट्र - १ / २ मुंबई/ नागपूर
२९) संचालक, लेखा व कोषागरे संचलनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
३१) सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३२) सर्व एकलव्य निवासी शाळांचे मुख्याध्यापक, ( प्रकल्प अधिकारी मार्फत )
३३) निवड नस्ती (का-१३-अ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.